**पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई कार्यालयाकडून दिनांक ०८ मार्च ते १० मार्च, २०२४ कालावधीत आयोजित करण्यात येणाऱ्या “महिला महोत्सव २०२४” च्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पुलदे-२०२४/प्र.क्र.२३/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२४

**वाचा :** संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र-पुलदे २०४, दिनांक २६.०२.२०२४

**शासन निर्णय :-**

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचेमार्फत दि.०८.०३.२०२४ ते दि. १०.०३.२०२४ या कालावधीत विविध कलाविष्कारांवर आधारित “महिला महोत्सव २०२४” चे आयोजन करण्याबाबत उपरोक्त संदर्भ क्र.१ अन्वये प्रस्तावित करण्यात आले आहे. अकादमीच्या प्रस्तावानुसार दि.०८.०३.२०२४ ते दि.१०.०३.२०२४ या कालावधीत “महिला महोत्सव २०२४” चे आयोजन करण्यास व सदर महोत्सवांतर्गत होणाऱ्या विविध कार्यक्रमांसाठी खालील तक्यात नमूद बाबींकरीता होणाऱ्या रु.१५,६०,०००/-(अक्षरी रूपये पंधरा लक्ष,साठ हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चास पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीस सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आहे.

| अ.क्र. | बाबनिहाय तपशील | अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १ | सांस्कृतिक कार्यक्रम कलाकार व समन्वयक, स्वयंसेवक व सुवासिनी मानधन | रू.६,६०,०००/- |
| २ | उदघाटन व भेटवस्तू खर्च | रू.२०,०००/- |
| ३ | रंगमंच, नेपथ्य साहित्य, खुर्च्या, सोफा, कार्पेट इ., प्रकाश व ध्वनि व्यवस्था खर्च | रू.२,००,०००/- |
| ४ | वर्तमानपत्र जाहिरात खर्च | रू.४,००,०००/- |
| ५ | निवास खर्च | रू.४५,०००/- |
| ६ | जेवण/अल्पोपहार खर्च | रू.४०,०००/- |
| ७ | अंतर्गत प्रवास खर्च | रू.१५,०००/- |
| ८ | सोशल मिडीया प्रसिध्दी, बॅनर, बोर्ड, व्हिडीओग्राफी एडिटिंग व लाईव्ह स्ट्रिमिंग खर्च | रू.६०,०००/- |
| ९ | एल ई डी स्क्रीन आणि ऑपरेटिंग खर्च | रू.३५,०००/- |
| १० | छायाचित्रकारावरील खर्च | रू.१५,०००/- |
| ११ | डिझाईन व छपाई खर्च | रू.५०,०००/- |
| १२ | इतर किरकोळ खर्च | रू.२०,०००/- |
| | **एकूण खर्च** | **रू.१५,६०,०००/-** |

(टिप-उपरोक्त तक्त्यात नमूद बाबनिहाय तपशीलामधील रक्कमांमध्ये १०% फेरफार करण्याचे अधिकार संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना राहतील.)

०२. सदर कार्यक्रमासाठी होणाऱ्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी कार्यक्रमानंतर एका महिन्याच्या आत शासनास सादर करावे.

०३. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक झेडडी-२२०५ कला व संस्कृती (०७) कला अकादमी (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई (अनिवार्य) (२२०५ १४६३) ५०-इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली त्या-त्या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०४. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग दोन, दिनांक १७ एप्रिल २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग तीन, अ.क्र.४,परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३०५१०४४३९६९२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.05 16:37:49 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य)यांचे स्वीय्य सहायक, मंत्रालय, मुंबई
७. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई
८. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
९. सह सचिव (कार्यासन व्यय-१५ /अर्थसंकल्प-११), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
१०. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती/सां.का.२